# जन वाचन आंदोलन





जनवाचन आंदोलन हे पुस्तकांना गावागावात घेऊन जाणारे आंदोलन आहे. नवसाक्षर व अर्धशिक्षित लोकांमध्ये पुस्तकांचे सामुदायिक वाचन करणे, ते ऐकणे आणि ऐकवणे हा याचा उद्देश आहे. आज गावातल्या लोकांपर्यंत पुस्तके पोचत नाहीत. त्यांची भाषा त्यांना उमगत नाही आणि किंमती परवडत नाहीत. अशा नव-वाचकांपर्यंत पुस्तके पोचवण्याचे काम भारत ज्ञान विज्ञान समितीने अंगिकारले आहे. ही पुस्तके प्रसिद्ध लेखकांची आणि सोपी, सुटसुटीत व स्वस्त किंमतीत असावीत असा प्रयत्न आहे.

या आंदोलनातून काय साध्य होईल?

गावागावात जनवाचनाची व जनवाचनालयांची संस्कृती निर्माण होईल. साक्षरता आंदोलनातून हस्तगत केलेली अक्षरकौशल्ये लोक स्वत: विकसित करू शकतील. त्यांच्या ज्ञानविज्ञानाच्या कक्षा विस्तारतील. त्यांच्या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक जाणिवांची पातळी उंचावू शकेल. आपल्या मूलभूत हक्कांच्या आणि एकंदर परिवर्तनाच्या लढ्यासाठी जागृत होऊन ते उभे ठाकू शकतील.

देशातील लोकशाही टिकण्यासाठी आणि अर्थपूर्ण होण्यासाठी हे आवश्यक आहे. साक्षरता म्हणजे केवळ अक्षर ओळख नव्हे तर संपूर्ण जग जाणण्याचे ते कार्य आहे. या दिशेने, गावागावातील लोकांच्या खांद्याला खांदा भिडवून, आम्ही पुढे जाऊ इच्छितो.




भारत ज्ञान विज्ञान समिती

किंमत रु. २-५०

# मेरी क्युरी

माधवी इनामदार



भारत ज्ञान विज्ञान समिती

पुस्तकाचे नाव : मेरी क्यूरी

लेखिका : माधवी इनामदार

संपादन : विनया देशपांडे
निर्मिती सहाय्य : गणेश कांबळे

चित्रकार : यश कळवणकर
युथ आर्टिस्ट ऑर्गनायझेशन

जवाआं/१९

प्रकाशन : फेब्रुवारी १९९७

नववाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समिती तर्फे राष्ट्रीय साक्षरता मिशनच्या सहकार्याने देशभर चालवल्या जात असलेल्या 'जनवाचन आंदोलन' मोहिमेसाठी प्रकाशित

मूल्य : २ रुपये ५० पैसे



प्रकाशक : दत्ता देसाई
राज्य समन्वयक, भारत ज्ञान विज्ञान समिती (महाराष्ट्र)
अक्षय, २१६, केळकर रस्ता, नारायण पेठ, पुणे ४११०३०
फोन : ४५६६९४
मुद्रण स्थळ : महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय, पुणे ४११००४

अक्षर जुळणी व मांडणी : दिनानाथ मनोहर

# मेरी क्यूरी

काळ्या कुट्ट अंधारात घड्याळाची वेळ कधी कळू शकते? गजराचं घड्याळ तुम्ही बघितलं असेल. त्यातले आकडे आणि काटे अंधारात चमकताना बघितलेत कधी? बरीच घड्याळे रात्री अशी चमकतात. हिरवट निळसर रंगात. मांजराचे डोळे चमकल्यासारखे. कशामुळे चमकतात हे काटे आणि आकडे? त्यात एक गमतीदार पदार्थ असतो. माहिती आहे कोणता ते? बरोब्बर, रेडियम.



हा रेडियम धातू शोधला कोणी? आहे ठाऊक? तो शोधला मेरी क्यूरी नावाच्या एका स्त्रीनं. जगात सर्वश्रेष्ठ मानले जाणारे 'नोबेल' पारितोषिक दोनदा मिळवणाऱ्या

विदुषीनं. तिनं जगभर विज्ञानाचा प्रकाश पसरवण्याचं महान कार्य केलं. मेरी केवळ थोर शास्त्रज्ञ नव्हती. तिच्यापाशी विशाल हृदय होतं. जगाविषयी, माणसांविषयी तिला अपार प्रेम होतं. ही कहाणी आहे या मेरी क्यूरीची.

मेरीचा जन्म पोलंड नावाच्या देशात झाला. तिचे वडील शिक्षक होते. ते शिस्तप्रिय होते. पण खूप प्रेमळ होते. वाचनाची त्यांना फार आवड. स्वत:च्या मुलांना ते विज्ञानाची पुस्तके वाचून दाखवत. त्याचबरोबर महान क्रांतीकारकांची पुस्तकंही वाचून दाखवत. तो काळच तसा होता. त्या काळी पोलंडवर परकीयांची जुलमी सत्ता होती. 'झार' नावाच्या राजाचे राज्य होतं. लोकांवर फार कडक बंधनं होती. लोकांना स्वत:ची मातृभाषा, म्हणजे पोलिश भाषा वापरायला बंदी होती. स्वदेशाचा इतिहास वाचायला बंदी होती.

मेरीच्या शाळेत वेगवेगळ्या देशातील सर्व वंशाच्या व धर्माच्या मुली होत्या. त्या एकत्र शिकत. एकत्र प्रार्थनाही करत आणि खेळतही. पण शाळेच्या बाहेर घराघरांमध्ये मात्र भेदाभेद चाले. एका धर्माचे लोक दुसऱ्या धर्माच्या लोकांकडं आपली मुलं पाठवत नसत. पण या साऱ्यांचा परिणाम मुलांवर होऊ नये असे शिक्षकांना वाटे. त्यासाठी त्या प्रयत्न करत. लपून छपून आपल्या देशाचा इतिहास



मुलांना शिकवत.

मेरीच्या मनावर या साऱ्याचा खूप खोलवर परिणाम झाला. तिला वाचायला खूप आवडायचं. एकदा वाचायला बसली की बाकी सारं ती विसरून जायची. तिच्या आईवडिलांना मात्र हे आवडायचं नाही. तिनं मस्त बागेत हुंदडावं, खेळावं, असा त्यांना वाटे. ते दोघेही खूपच प्रेमळ होते. मेरीचा शाळेत सतत पहिला क्रमांक असे. शाळेत देखील ती सगळ्यांची लाडकी होती.

पण हे आनंदाचे दिवस फार काळ टिकले नाहीत. मेरीच्या लाडक्या बहिणीचा मृत्यू झाला. पाठोपाठ आईदेखील वारली. त्यांच्या मृत्यूमुळे मेरी खूपच उदास झाली.

पोलंडमध्ये मुलींना उच्चशिक्षण घ्यायला बंदी होती. आता आपल्या पुढील शिक्षणाचे काय? तिच्या मनात खूप खळबळ सुरू झाली. त्याचवेळी पोलंडमध्ये स्वातंत्र्याची चळवळ सुरू होती. लोक जागृत होत होते. देशप्रेमी तरूण स्फोटके जमवत. जुलमी अधिकाऱ्यांना ठार करत. अशा तरूणांना सुरूवातीला मेरी मदत करत असे. परंतु हिंसेवर तिचा विश्वास नव्हता. त्यामुळे एका वेगळ्या चळवळीकडे ती ओढली गेली. परकीय लोक आपल्या बहुजन समाजाला अज्ञानात ठेवतात. आपल्यावर सत्ता गाजवतात, हे तिला

दिसत होते. त्याकाळी इतर देशात विज्ञानाचा खूप विकास झाला होता. परंतु पोलंडमध्ये लोकांना हे ज्ञान घेण्याची बंदी होती. समाजाला जागं करण्यासाठी गुप्तपणे मंडळे चालवली जात. स्वातंत्र्यासाठी तरूणांना, बहुजन समाजाला हे ज्ञान देण्याचे काम या मंडळांतून चाले. मेरी त्यात सहभागी झाली. तिथं इतिहास, शरीरशास्त्र, समाजशास्त्र या विषयांवर तिनं लिहीले. महिलांना ते वाचून दाखवण्याचे कामही ती करत असे.

नवे ज्ञान मिळवण्यासाठी ती सतत धडपडे. ती कविता वाचे. वेगवेगळ्या तत्त्वज्ञानाची पुस्तकंसुद्धा ती वाचत असे. त्यातून तिला नवेनवे विचार मिळत. अशा नव्या विचारांचा नवा माणूस घडवला पाहिजे असे तिला वाटे. एक नवा समाज निर्माण व्हावा अशी तिची तळमळ होती. एका माणसानं दुसऱ्याचं शोषण करणे तिला चुकीचे वाटे. सगळ्यांनी एकमेकांशी सहकार्य करावं, प्रेमानं रहावं असे तिचे विचार होते. याच विचारांमुळे ती स्वत: समाजाचं ऋण मानत असे. लोकांसाठी आपण काहीतरी करावसं तिला वाटे. पुढे आयुष्यभर ती त्यासाठीच झटली. मोठ्या बहिणीच्या उच्च शिक्षणासाठी तिनं मदत केली. डॉक्टर होण्यासाठी तिची बहिण दुसऱ्या देशात गेली. त्यावेळी शिकवण्या करून मेरीने पैसे मिळवले. स्वत:चं घर सोडून ती एका खेड्यात गेली. खरं तर श्रीमंतांचा तिला तिटकारा होता. पण नाईलाजानं ती त्यांच्या घरात राहिली. श्रीमंतांच्या मुलांना शिकवायचं





काम तिनं पत्करलं. तिनं निष्ठेनं ते काम केलं पण त्या मुलांना शिकण्यात खरा रस नव्हताच. मग तिनं आसपासच्या मजुरांची, शेतकऱ्यांची मुलं गोळा केली. त्यांना साक्षर करायला सुरूवात केली. सुरूवातीला ही मुलं शिकलेलं विसरायची. पण हळुहळू त्यांच्यात प्रगती झाली. त्यांना वाचायला येऊ लागलं. त्यांच्या आईवडलांना तर जादू झाल्यासारखीच वाटली. आपल्या मुलांना लिहावाचायला येतं हे पाहून त्यांना खूप आनंद झाला.

अशातच त्या घरातील मोठा मुलगा सुट्टीत घरी आला. मेरीचा शांत स्वभाव आणि हुशारी यामुळे त्याला ती आवडू लागली. तरूण वय होतं. मेरीसुद्धा त्या तरूणावर भाळली. त्या दोघांनी लग्न करायचं ठरवलं. परंतु आपल्या घरी काम

करणाऱ्या मुलीला सून करून घ्यायचे? छे..छे! मुलाच्या आईवडलांनी त्याला विरोध केला. त्यांची श्रीमंती, प्रतिष्ठा आड आली. त्या तरूणाने घाबरटपणा केला. मेरीचे गुण महत्वाचे आहेत हे आईवडलांना पटवण्याचे धाडस त्यानं दाखवलं नाही. त्यानं माघार घेतली.

मेरीवर हा फार मोठा आघात होता. पण तिने मोठ्या धीरानं तो सहन केला. एकटीनेच पचवला. हे दु:ख घरी तरी कसे कळवणार? सुट्टी संपताच तिनं नोकरीला रामराम ठोकला. ती परत आपल्या गावी आली. तिनं नवी नोकरी धरली. वडलांकडे आल्यामुळे तिचं दु:ख हलकं झालं. स्वत:च्या अभ्यासावर तिला लक्ष केंद्रित करता आलं.

पुढील शिक्षणासाठी मोठ्या बहिणीनं तिला पॅरिसला बोलावून घेतलं. स्वत:चा देश आणि मायेचं घर सोडून जाताना तिला यातना झाल्या. परंतु तिला शिक्षणाची ओढ लागली होती, स्वत:च्या कष्टाने जमवलेली छोटीसी पुंजी तिच्याबरोबर होती, ती घेऊन ती पॅरिसला आपल्या बहिणीकडे आली. तिने कॉलेजमध्ये प्रवेश घेतला. इथे स्त्रियांना लिहिण्या वाचण्यावर बंधने नव्हती. असे स्वातंत्र्य ती प्रथमच अनुभवत होती. तिची राहणी अगदी साधी होती. अगदी कमी पैशात ती गुजराण करत असे. एका इमारतीत सहाव्या मजल्यावर एका छोट्याश्या खोलीत ती रहायची. पाणी आणायला खाली जावे लागे. घरी दिव्याचा खर्च नको म्हणून रात्री दहापर्यंत ती वाचनालयात वाचत बसे. पोलंडमधून आणलेले कपडेच ती ४ वर्षे वापरत होती. इथे खूप कडाक्याची थंडी पडे, इतकी की तिला सर्वच कपडे लपेटून घ्यावे लागत. अभ्यासात ती इतकी दंग असे की तिला जेवणाची शुद्ध नसे. दोन दोन दिवस ती उपाशी राही. या सगळ्या कष्टातूनही तिने पदवी परीक्षेत उत्तम गुण मिळवले.

आता तिला उच्च शिक्षण घ्यायचं होतं. त्यासाठी संशोधन करायचे होते. तिची पिएर क्यूरी ह्या थोर शास्त्रज्ञाशी ओळख झाली. त्यांच्या मदतीने तिने संशोधनाला सुरूवात केली. मेरीचा कष्टाळूपणा, तिची स्वाभिमानी वृत्ती त्यांना आवडली. तिनं वाचनातून मिळवलेले प्रचंड ज्ञान बघून ते प्रभावित झाले.

प्राध्यापक क्यूरी हे स्वतंत्र वृत्तीचे होते. त्यांची बुद्धी अगदी तल्लख होती. १८ व्या वर्षीच त्यांनी आचार्य पदवी मिळवली होती. पंधरा वर्षे ते संशोधन करत होते. ते शास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्ध पावले होते. विज्ञानातील काही नियम त्यांच्या नावानेच ओळखले जाऊ लागले होते. असा हा थोर शास्त्रज्ञ अगदी कमी पगारात काम करत होता. नवनवीन शोध लावण्यासाठी धडपडत होता. त्यांना मान सन्मानाचा तिटकारा होता. निसर्गाबद्दल त्यांना फार प्रेम होते. त्यांचा

स्वभाव मायाळू होता.



लग्न केले तर आपले संशोधन अर्धे राहील असे आधी त्यांना वाटत असे. परंतु मेरीला भेटल्यावर त्यांचे विचार बदलले. मेरीची शालिनता, धैर्य यावर ते मोहित झाले. मेरीचे विचार मात्र वेगळे होते. तिला वाटे, शिक्षण घेऊन पोलंडला जावे. आपल्या देशाची, जनतेची सेवा करावी. त्यामुळे ती लग्नाचा विचारही करत नव्हती. पिएरनी मेरीला पटवले की, संशोधन करूनही मानवाची सेवा करता येते. आपल्याशी लग्न करण्यासाठी त्यांनी तिचे मन वळवले.



१८९५ मध्ये त्यांचा विवाह झाला. विवाह त्यांनी अगदी साधेपणानं केला. लग्नाचा पोशाख, दागिने, धार्मिकविधी या गोष्टींना त्यांनी फाटा दिला. अगदी मोजकी, जवळची माणसं लग्नाला हजर होती.

दोन छोट्या खोल्यात मेरीनं आपला संसार थाटला. घरातील कामे ती स्वत:च करी. पण संशोधनाला वेळ देणेही फार आवश्यक होते. त्यासाठी कमी वेळेत करण्याचे पदार्थही तिने शोधले. कंटाळा आला तर ती दोघंही सायकलवरून फिरायला जात. दोघांचे संशोधन चालूच होते.

जगभर विज्ञानाची दौड चालू होती. नवनवे शोध लागत होते. काही वस्तू स्वयंप्रकाशी असतात असा शोध लागला होता. युरेनियम नावाच्या धातूतून काही किरण बाहेर पडतात. हे किरण येतात कुठून? मेरीचे कुतूहल जागे झाले. तिने हाच विषय संशोधनासाठी निवडला. एका अडगळीच्या खोलीत प्रयोगाला सुरूवात झाली. अगदी मोजकी साधनं, प्रतिकूल हवामान, असूनही तिनं संशोधनाला सुरूवात केली. तिच्या अथक परिश्रमांना यश येत आहे हे दिसू लागले. पण तिला मदतीची गरज होती. तिच्या नवऱ्याने आपलं संशोधन बाजूला ठेवलं. ते तिला मदत करू लागले. दोघंही रात्रंदिवस धडपडत होते. त्यात ते यशस्वी झाले. एकाऐवजी दोन

धातूंचा शोध लागला. एका धातूला तिने स्वत:च्या देशावरून



नाव ठेवले,'पोलोनियम'. दुसऱ्यालानाव दिलं, 'रेडियम'. रेडियम शुद्ध स्वरूपात वेगळा करण्यासाठी पुढचे प्रयोग सुरू झाले. पण त्यासाठी मोठी प्रयोगशाळा हवी होती. धातू असलेली माती हवी होती. पैशांची तर अडचण होतीच. त्यावेळी युरेनियम धातू काढून ती माती टाकून दिली जायची. अशी टनावारी माती त्यांनी फुकट मिळवली. त्यावरच त्यांचे नवे प्रयोग सुरू झाले. त्यासाठी एक छोटी खोली मिळाली. ती देखील गळकीच!

ढीगभर मातीतून 'रेडियम' धातू वेगळा काढायचा होता.



हे काम खूप कष्टाचं, तासनतास चालणारं होतं. त्यासाठी रसायनं उकळावी लागतं. त्यातून येणारा उग्र वास सहन करावा लागायचा. मध्येच पाऊस आला तर मिश्रण खराब होण्याची भीती असे. अशा सगळ्या अडचणींना ती दोघं तोंड देत होती. रात्रंदिवस काम करत होती. चार-पाच वर्षे सतत हे काम चालू होतं. २६ डिसेंबर १९०२ हा दिवस, त्यांच्या आयुष्यात फार महत्त्वाचा ठरला. त्या रात्री ते प्रयोगशाळेत डोकावले. निळसर हिरव्या रंगाच्या किरणांनी चमकून त्यांना दर्शन दिले. बरणीमध्ये खडे चमकत होते. हाच तो रेडियम धातू! आज आपण घड्याळ्याच्या आकड्यांमध्ये रात्री चमकताना पाहतो.

हळुहळू रेडियमचे एक एक गुणधर्म उजेडात येऊ लागले. पिएरनी रेडियमच्या किरणांसमोर आपला हात काही वेळ धरला. हात भाजून त्यावर फोड आले. ती जखम भरून यायला दोन महिने लागले. परंतु त्यामुळेच काही नवे शोध लागले. रोगाच्या पेशी नष्ट करण्याची शक्ती रेडियम मध्ये आहे हे सिद्ध झाले. त्यामुळं कॅन्सरसारख्या असाध्य रोगावर इलाज करणे शक्य झाले. त्यासाठी रेडियमचा उपयोग होऊ लागला.

क्यूरी पति-पत्नीचा गौरव होऊ लागला. त्या दोघांनी अनेक विषयावर संशोधन केले. महत्त्वाचे लिखाण केले. मेरीला पदार्थ विज्ञानातील 'डॉक्टर' ही पदवी मिळाली.

१९०३ साली तिला नोबेल पारितोषिक मिळाले. जागतिक किर्तीचे हे बक्षीस मिळवणारी ही पहिली महिला ठरली.

आजवर अडगळीच्या खोलीत ही जोडी काम करत होती. पण आता त्यांच्याकडे जगाचे लक्ष वेधले. रेडियमचे उपयोग जगापुढं आले. त्यामुळं त्यांचं महत्व वाढलं.



कारखानदार रेडियमचे उत्पादन करण्यासाठी लक्ष घालू लागले. हा क्षण क्यूरी दांपत्यासाठी कसोटीचा होता. रेडियमचा शोध त्यांनी लावला होता. या धातूवर ते मालकी हक्क



सांगू शकले असते. कायद्याने तशी नोंद करता आली असती. रेडियमच्या उत्पादनासाठी त्यांची परवानगी घ्यावी लागली असती. त्यासाठी ते पैसे घेऊ शकले असते. गडगंज संपत्ती मिळवू शकले असते. मोठमोठे कारखानदार त्यांच्या मागे लागले होते. परंतु क्यूरींनी असं करणं नाकारलं. आपलं ज्ञान सर्व जगापुढे खुलं केलं. ज्ञानाची मक्तेदारी त्यांना मान्य नव्हती. शास्त्रीय ज्ञान हे सर्वांचे असतं. ते सर्वांना समजलं पाहिजे. कुणी एकानं त्याच्यावर हक्क सांगून पैसे मिळवणं गैर आहे, असंच त्यांच मत होतं.



दरम्यानच्या काळात मेरीने दोन मुलींना जन्म दिला. इरिन आणि इव्ह. लागोपाठ दोन बाळंतपणं झाली. मुलींचं संगोपन करावं लागे. त्यामुळं त्यांचा खर्चाचा बोजा वाढला. परंतु मेरी डगमगली नाही. तिनं त्यासाठी शाळेची नोकरी केली. नोकरी, संसाराची जबाबदारी, आणि रात्री संशोधन ही सर्व कामं तिने मोठ्या आनंदानं केली. शास्त्रज्ञाचं जीवन खूप दगदगीचं व कंटाळवाणं असतं. पण मेरी व पिएर एकमेकांच्या सहवासात खूप

आनंदात रहात. प्रयोगशाळेत ते एकत्र काम करायचे. सुट्टीला विश्रांतीसाठी निसर्गरम्य ठिकाणी जायचे. मुलींबरोबर हिरवळीवर लोळायचे. तळ्यात डुंबायचे. हा त्यांचा आवडीचा कार्यक्रम होता. मग ताजेतवाने होऊन उत्साहाने कामाला लागायचे. या साऱ्या कामातूनही वेळ काढून मेरीने मुलींच्या वाढीकडे लक्ष दिले. त्याचेही तपशील मेरीने लिहून ठेवले आहेत.

परंतु आनंदाचे हे दिवस फार काळ टिकले नाहीत. पिएरला अपघात झाला. त्यातच त्याचे निधन झाले. मेरीला प्रचंड धक्का बसला. ती एकाकी झाली. तिनं शोक व्यक्त केला नाही, मात्र तिचं जीवन एखाद्या यंत्राप्रमाणं नीरस झालं.

पतीच्या निधनामुळं अनेक प्रश्न निर्माण झाले. दोघांनी सुरू केलेल्या कामाचं पुढं काय? मेरी घरखर्च कसा चालवणार? मेरीने पेन्शनसाठी खटपट करावी असं काही मित्रांनी सुचवलं. परंतु तिने ते साफ नाकारलं. पुन्हा एकदा धैर्यानं ती उभी राहिली. तिनं पुढं शोधकार्य चालू ठेवलं. सहा महिन्यातच रेडियम विषयीचा तिचा ग्रंथ प्रकाशित झाला. सोबोर्न विद्यापीठात त्यावेळी ती प्रमुख पदावर काम करीत होती. १९११ मध्ये रासायनिक विभागाचे नोबेल पारितोषिक तिला देण्यात आले. दोनदा पारितोषिक मिळवणारी मेरी ही एकमेव महिला शास्त्रज्ञ.



१९१४ साल उजाडलं. पहिल्या महायुद्धाला सुरूवात झाली. प्रयोगशाळेचं काम बंद करावं लागलं. आता प्रश्न होता, आराम करायचा की लोकांची सेवा? मेरीनं ठरवलं लोकांची सेवा करायची. ती स्वयंसेवक बनली. युद्धाच्या ठिकाणी तिच्या लक्षात आलं की क्ष-किरण यंत्रं नाहीत. विजपुरवठाही कमी व बेभरवशाचा. मग गाडीच्या बॅटरीवर चालणारं क्ष-किरण यंत्र तिनं शोधलं. त्यासाठी अनेक श्रीमंत लोकांकडून गाड्याही मिळवल्या. पण इतकी यंत्रं चालवायची कशी? मग तिच्या मुलीनं इरीनने यंत्रं चालवण्याचे प्रशिक्षण लोकांना दिले.

मदतकार्यात त्यांनी स्वत:ला झोकून दिलं. खरं तर आजारपणातून त्या नुकत्याच उठल्या होत्या. पण तरी खाण्यापिण्याची त्यांना शुद्ध नसे. दोन-दोन दिवस उपाशी राहून त्या सैनिकांची शुश्रुषा करत. कामचुकार अधिकाऱ्यांना दरडावत. फोनची घंटी वाजली की गाडी घेऊन त्या बाहेर पडत. अडचण होऊ नये म्हणून त्या गाडी चालवायला शिकल्या. ती दुरूस्त करायलाही शिकल्या. इतर डॉक्टरांना मदत करता यावी म्हणून त्यांनी शरीरशास्त्राचाही अभ्यास केला. रणांगणावर त्या सगळीकडे हिंडत. तोफांचे आवाज कानावर येत असत. आजुबाजूला बॉंब गोळे येवून पडत पण त्या कशाचीही पर्वा करत नसत.

त्या स्वत: ह्या युद्धात तर राबल्याच परंतु आपली सगळी मालमत्ताही त्यांनी राष्ट्रीय निधीला दिली. एवढंच काय, त्यांना बक्षीस म्हणून मिळालेली पदकेही विकायला त्यांनी बँकेत आणली. त्याचे येणारे पैसे राष्ट्रीय निधीत देण्यासाठी. पण बँकेचा मॅनेजर त्यांच्यावर रागावला. ही महान पदकं विकू नका अशी विनंती त्यानं केली. आणि ती पदकं परत केली. जेव्हा युद्ध थांबल्याची बातमी आली तेव्हा मेरी क्यूरीला अतिशय आनंद झाला.

एकदा एक अमरिकन वार्ताहर त्यांच्याकडे आली. मुलाखतीत तिने क्यूरींना गंमतीदार प्रश्न विचारला. ''या क्षणी जगातली कोणती गोष्ट मागायला तुम्हाला आवडेल?'' त्या म्हणाल्या, ''मला एक ग्रॅम रेडियम पाहिजे आहे. तो मिळाला तर मला आणखी प्रयोग करता येतील. पण रेडियम फार महाग आहे. मला तो परवडत नाही.'' हे उत्तर ऐकून त्या पत्रकार स्त्रीला धक्का बसला.या महान शास्त्रज्ञ बाईला इतकी साधी गोष्ट मिळू नये? त्या बाई अमेरिकेला गेल्या. तेथील लोकांकडून त्यांनी पैसे जमा केले. मेरी क्यूरीच्या सत्काराची योजना आखली.

अमेरिकेत मेरी क्यूरीचे भव्य स्वागत झाले. त्यांना अनेक पारितोषिके दिली गेली. पदव्या देवून त्यांचा गौरव करण्यात आला. आणि भव्य सरकारी सोहळ्यात त्यांना तो



रेडियम देण्यात आला. पण क्यूरींनी हा रेडियम स्वत:साठी घेतला नाही. तर त्यांच्या संशोधन करणाऱ्या संस्थेला देवून टाकला. त्यांच्या ह्या त्यागाने साऱ्या जगाचे मन हेलावलं.

आपलं सर्वस्व लोकांना देणाऱ्या मेरी क्यूरी यांचा ४ जूलै १९३४ रोजी मृत्यू झाला.

स्त्रियांचं क्षेत्र चूल आणि मूल एवढंच का? आजही असा वाद घातला जातो. स्त्रिया घराबाहेर पडल्या तर त्यांच्यावर शिंतोडे उडवले जातात. थोर शास्त्रज्ञ मेरी क्यूरी यांनाही अशा गोष्टींना तोंड द्यावं लागलं. परंतु त्यांनी त्याकडं दुर्लक्ष केलं. आपलं सर्वस्व पणाला लावलं. आपलं कर्तृत्व जगाला त्यांनी दाखवून दिलं. चर्चा न करता कृती केली. चिकाटीने शेवटपर्यंत मानव जातीची सेवा त्यांनी केली. आणि त्यांनी जगाला स्त्रीमधल्या शक्तीचे महान दर्शन घडवले.

